**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे मार्च, २०२५ चे सवलतमूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी रु.४१६.९० कोटी इतका निधी वितरित करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्र.एसटीसी-०४२५/प्र.क्र.११०/परि-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ मे, २०२५.

**संदर्भ :-** उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/नोंदणी/८१८, दि.२४.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे मार्च, २०२५ चे सवलतमूल्य उपलब्ध करण्याबाबत उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रान्वये शासनास विनंती केली आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे मार्च, २०२५ चे सवलतमूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे मार्च, २०२५ च्या सवलतमूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी रु.४१६.९० कोटी इतकी रक्कम (अक्षरी रूपये चारशे सोळा कोटी नव्वद लाख फक्त) रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रु.४१६.९० कोटी इतका निधी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामधील “मागणी क्र.बी-३ लेखाशिर्ष २०४१ वाहनांवरील कर (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना- परिवहन आयुक्त (अनिवार्य) (दत्तमत) (२०४१००१८) ३३-अर्थसहाय्य” या लेखाशिर्षामधून खर्च करण्यात यावा. सदरचे अर्थसहाय्य हे “बिनशर्त” आहे.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६८/२०२५/व्यय-८, दि.२८.०४.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५०२१२५८१४३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA ASHISH GANVIR

Digitally signed by SARIKA ASHISH GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA ASHISH GANVIR
Date: 2025.05.02 12:59:05 +05'30'

**(सारिका मेंढे (गणवीर))**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (परिवहन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६) सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७) मा.राज्यमंत्री (परिवहन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
९) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (परिवहन) यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१५) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१६) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१७) निवडनस्ती कार्यासन परि-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.